**श्री साईबाबा समाधी वर्षानिमित्त योगीराज सद्‌गुरु गंगागिरीजी महाराज १७१ वा अखंड हरिनाम सप्ताहासाठी सप्ताह समितीस रु.७५ लक्ष इतके अर्थसहाय्य करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग,**
**शासन निर्णय क्र.सासंवि -१०१८/१०३१/प्र.क्र.११३/का.१६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
**दिनांक : २० ऑगस्ट, २०१८.**

<u>संदर्भ</u>:- १) मुख्य कार्यकारी अधिकारी,श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था,शिर्डी यांचे पत्र क्र.एसएसएसटी/बांधकाम-शताब्दी /११३७/२०१८, दि.०१.०६.२०१८
२) मुख्य कार्यकारी अधिकारी,श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था,शिर्डी यांचे पत्र क्र.एसएसएसटी/ बांधकाम-शताब्दी /१६३५/२०१८ दि.०३.०७.२०१८

<u>प्रस्तावना:-</u>

श्रीक्षेत्र शिर्डी येथे शिर्डी ग्रामस्थांच्या वतीने योगीराज श्री गंगागिरीजी महाराज यांच्या १७१ व्या अखंड हरिनाम सप्ताहाचे दि. १६.०८.२०१८ ते २३.०८.२०१८ या कालावधीत आयोजन करण्यात येत आहे. हा सप्ताह अतिशय भव्य स्वरुपात साजरा होत असून त्याची भव्यता व भक्तीमय स्वरुप यामुळे समाधी शताब्दी वर्षातील तो सर्वाधिक भव्य असा कार्यक्रम ठरेल. शिर्डीत प्रकट झालेल्या तरुण साईबाबांना संत म्हणून सर्वप्रथम सद्‌गुरु श्री गंगागिरी महाराजांनी ओळखले. या पार्श्वभुमीवर शिर्डी येथे समाधी शताब्दी वर्षानिमित्त होणाऱ्या या सप्ताहास विशेष महत्व आहे. अध्यक्ष, श्री गंगागिरीजी महाराज १७१ वा अखंड हरिनाम सप्ताह समितीद्वारे या सप्ताहासाठी रु. ७५ लाख इतकी रक्कम देण्याची विनंती करण्यात आलेली आहे.दि.०४.०४.२०१८ रोजीच्या व्यवस्थापन समितीच्या सभेत “योगीराज सद्‌गुरु गंगागिरीजी महाराज यांच्या अखंड हरिनाम सप्ताह साजरा करण्यासाठी तसचे सदरहू सप्ताहासाठी सदर सप्ताह साजरा करण्यासाठी गठीत समितीस संस्थानमार्फत रु.७५/- लाख आर्थिक सहाय्य देण्याचा निर्णय घेण्यात आला. संस्थानचा सहभाग केवळ सदर निधी देण्यापुरताच मर्यादित राहिल. तसेच योगीराज सद्‌गुरु गंगागिरीजी महाराज यांच्या १७१ व्या अखंड हरिनाम सप्ताहासाठी येणाऱ्या भाविकांच्या दर्शनासाठी सदरहू ठिकाणी श्रींच्या मूळ पादुका उपलब्ध करुन द्यावयाच्या असल्याने, श्रींच्या पादुकांसाठी स्वतंत्र वेगळे स्टेज तयार करण्यात यावे व पादुकांजवळ संस्थानच्या दक्षिणा पेट्या ठेवण्यात याव्यात. त्याचप्रमाणे समितीमध्ये सर्व व्यवस्थापन समिती सदस्यांचा समावेश करण्याबाबत अध्यक्ष, सप्ताह समिती यांना कळविण्यात यावे.” याप्रमाणे निर्णय घेण्यात आला.

छाननी समितीच्या दि.२५.०५.२०१८ रोजीच्या सभेत काही अटी घालून शासन मान्यतेने विशेष बाब म्हणून मंजुरी देण्यात येत आहे, असा निर्णय घेण्यात आला आहे. त्याप्रमाणे मुख्य कार्यकारी अधिकारी, श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी यांच्या संदर्भाधीन पत्रांन्वये श्री क्षेत्र शिर्डी येथे ग्रामस्थाच्या वतीने आयोजित श्री गंगागिरी महाराज १७१ वा अखंड हरिनाम सप्ताहानिमित्त श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी यांच्यामार्फत रु.७५ लाख इतकी रक्कम देण्याची विनंती केली आहे. संस्थानच्या सदर विनंतीनुषंगाने श्री गंगागिरी महाराज यांच्या १७१ वा अखंड हरिनाम सप्ताहासाठी “एक विशेष बाब” म्हणून रु.७५ लाख इतकी रक्कम अनुदान म्हणून मंजुर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

श्रीक्षेत्र शिर्डी येथे शिर्डी ग्रामस्थांच्या वतीने योगीराज श्री गंगागिरीजी महाराज यांच्या १७१ व्या अखंड हरिनाम सप्ताहाचे दि. १६.०८.२०१८ ते २३.०८.२०१८ या कालावधीत आयोजन करण्यात येत आहे. हा सप्ताह अतिशय भव्य स्वरुपात साजरा होत असून त्याची भव्यता व भक्तीमय स्वरुप यामुळे समाधी शताब्दी वर्षातील तो सर्वाधिक भव्य असा कार्यक्रम आहे. या अखंड हरिनाम सप्ताहासाठी श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी यांच्यामार्फत "एक विशेष बाब" म्हणून रु.७५ लाख इतकी रक्कम अनुदान म्हणून देण्यास खालील अटींच्या अधीन राहून या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

१) सप्ताह समितीमध्ये शिर्डी संस्थानचे व्यवस्थापन समितीचे सर्व पदाधिकारी, पदसिध्द सभासद/ सदस्य राहतील.

२) व्यासपीठावर दर्शनीभागात श्री साईबाबा यांचे पूर्णाकृती अंदाजे ५X५ फूट साईजचे फ्लेक्सचे फोटो लावण्यात यावेत आणि त्याखाली श्री साई शताब्दी वर्षाचा उल्लेख करणे.

३) ज्या ठिकाणी सप्ताह समितीच्या सदस्यांचे नावाचे बोर्ड/फलक लावले जातील त्या ठिकाणी बाजूला व्यवस्थापन समितीचे सर्व सदस्यांचे नावाचा बोर्ड लावावा लागेल.

४) मुख्य पाहुण्यांचे व इतर महनीय व्यक्तींचे स्वागत करतेवळी स्वागताचा एक मान शिर्डी संस्थानचे अध्यक्ष, उपाध्यक्ष, मुख्य कार्यकारी अधिकारी व व्यवस्थापन समितीचे इतर सदस्य यांना राहील.

५) शासनाकडून मान्यता मिळाल्यानंतर अनुदान वितरणापूर्वी शिर्डी संस्थानाने वरील बाबींची पूर्तता करुन घ्यावी व तदनंतरच अनुदान वितरीत करावे.

६) सप्ताह समाप्तीनंतर तीन महिन्याचे कालावधीत लेखापरिक्षणाचा अहवाल शिर्डी संस्थानचे मुख्य कार्यकारी अधिकारी यांना देणे आवश्यक राहील. तसेच सहायक धर्मादाय उपआयुक्त यांच्या दि.०९.०४.२०१८ रोजीच्या पत्रातील १ ते ३ क्रमांकावरील अटींची पूर्तता करणे आवश्यक आहे.

सदर शासन महाराष्ट्र शासनाच्या www.maharahstra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०१८०८३११७११४८०८१२ असा आहे. हा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Salunke Sunita Parag
Date: 2018.08.31 17:13:41 +05'30'

**( सु.प.साळुंके )**
**कार्यासन अधिकारी, विधि व न्याय विभाग.**

**प्रतिः-** १) प्रधान सचिव व विधि परामर्शी, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई,
२) मा. अध्यक्ष, श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी, जि.अहमदनगर,
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी, जि.अहमदनगर,
४) निवड नस्ती/का.१६